**नंदलाल समिती अहवालानुसार ठाणे महानगरपालिका यांनी सेवानिवृत्त अभियंते श्री.टि.सी.राजेंद्रन यांचेविरुध्द न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्याकरीता मंजुरी मिळण्याबाबतचा ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: - ठामपा-२११५/सं.क्र.४९/प्र.क्र.४४/नवि-२३**

मादाम कामा रोड ,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- १६ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ :-**

(१) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे क्र. ठामपा/कार्मिक/आयुक्त-१२१३, दिनांक १०.०२.२०१५
(२) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक १२.०७.२०१६
(३) अतिरीक्त आयुक्त (२), ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्र. ठामपा/कार्मिक/उपआ (मु) / अतिआ-/८०८/३०२५, दिनांक २३.०९.२०१६

**प्रस्तावना : -**

ठाणे महानगरपालिका क्षेत्रात रस्त्यांवर सोडीयम व्हेपर दिवे लावणे प्रकरणी नंदलाल समितीच्या अहवालानुसार शासनाच्या आदेशाप्रमाणे महानगरपालिकेने १४ नगरसेवक यांचेविरुध्द नौपाडा पोलिस स्थानकात गु.र.क्र. २३२/२००० दाखल करण्यात आला आहे. सदर प्रकरणात पोलिस तपासामध्ये ठाणे महानगरपालिकेचे उप नगर अभियंता श्री.तयवळपीळ राजेंद्रन, उपशहर अभियंता विद्युत (सेवानिवृत्त) व प्रतिनियुक्तीवरील तत्कालीन कार्यकारी अभियंता, श्री.एस.एस.सोलंकी, यांचेवर पोलिस विभागाने गुन्हा दाखल केला आहे.

उपरोक्त विषयाबाबत गुन्हे शाखा, भिवंडी, युनिट-२ यांनी दिनांक २६.०९.२०१४ व सहाय्यक पोलिस आयुक्त, गुन्हे शाखा, ठाणे शहर यांचे दिनांक २२.१.२०१५ अन्वये नौपाडा पो.स्टे. गु.रं.नं. । २३२/२००० भा.द.वि.स. ४२०, ४०९, ३४ या गुन्ह्यातील आरोपीत श्री.तयवळपीळ राजेंद्रन, उपशहर अभियंता विद्युत (सेवानिवृत्त) ठाणे महानगरपालिका यांचेविरुध्द नमूद गुन्ह्यात भा.द.वि.स.चे कलम १९७ अन्वये दोषारोपपत्र पाठविण्याची मंजूरी मिळण्यास देखील आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र. १ अन्वये विनंती केली होती.

तसेच ठाणे महानगरपालिकेच्या महासभेने प्रशासनाचा श्री.राजेंद्रन यांचेविरुध्द न्यायालयात दोषारोपपत्र पाठविण्याचे प्रस्ताव ठराव पारीत केला नसल्याने महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ अन्वये ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ विखंडीत करण्याबाबत आयुक्त, ठाणे महानगरपालिकेने विनंती केली होती.

त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये ठाणे महानगरपालिकेच्या महासभेने केलेल्या ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ लोकहिताच्या व ठाणे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४१५ (१)

अन्वये प्रथमत: निलंबित करण्यात आला. तसेच सदर शासन निर्णयात संबंधितांना या प्रकरणी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (२) मधील तरतुदीनुसार अभिवेदन करावयाचे असल्यास उक्त आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत शासनास सादर करण्याबाबत नमुद करण्यात आले होते. तथापि, ठाणे महानगरपालिकेने दिनांक २३.०९.२०१६ च्या पत्रान्वये शासन स्तरावर होत असलेल्या कार्यवाहीस महानगरपालिका प्रशासन सहमत असल्याचे कळविले आहे.

त्यानुषंगाने ठाणे महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ बाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -:**

नंदलाल समितीच्या अहवालानुसार ठाणे महानगरपालिकेच्या क्षेत्रात सोडीयम व्हेपर दिवे लावणे प्रकरणी तत्कालीन अभियंता श्री.टी.सी.राजेंद्रन यांचेविरुध्द न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्याचा ठराव ठाणे महानगरपालिकेच्या महासभेने ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ नुसार अमान्य केला आहे. ठाणे महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलला उक्त ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ लोकहिताच्या व ठाणे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) अन्वये प्रथमत: निलंबित करण्यात आला होता.

ठाणे महानगरपालिकेने दिनांक २३.०९.२०१६ च्या पत्रान्वये शासन स्तरावर होत असलेल्या कार्यवाहीस महानगरपालिका प्रशासन सहमत असल्याचे कळविले आहे. यास्तव, ठाणे महानगरपालिकेचा उक्त ठराव क्र. २४५, दिनांक १८.१०.२००८ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov०.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१६१११६१७२५००३९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2016.11.16 17:27:51 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, ठाणे महानगपालिका, जि. ठाणे
५) उप सचिव (श्री. परशुरामे), नगर विकास विभाग, यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महापालिका सचिव, ठाणे महानगपालिका
७) निवड नस्ती (नवि-२३) नगर विकास विभाग